सन 1991 च्या कार्यमुक्त जनगणना कर्मचा-यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अधिकार कक्षेतील गट 'क' मधील लिपिक वर्गीय' पदावरील नियुक्तीसाठी उच्च वयोमर्यादा शिथील करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक एईएम-1097/प्र.क्र.77/97/16-अ,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 30 नोव्हेंबर 1998.

वाचा :-

(1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-1097/प्र.क्र.77/97/16-अ, दिनांक 12 मार्च 1998.

(2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईएम-1097/प्र.क्र.77/97/16-अ, दिनांक 27 मे 1998.

(3) शुध्दीपत्र क्रमांक एईएम-1097/प्र.क्र.77/97/16-अ, दिनांक 27 मे 1998.

(4) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्र क्रमांक 1442/317/2, दिनांक 9 जुलै 1998.

**शासन निर्णय :** सन 1991 च्या कार्यमुक्त जनगणना कर्मचा-यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अधिकार कक्षेतील शासन सेवेतील गट 'क' मधील लिपिक वर्गीय पदावरील सरळ सेवेने नियुक्तीसाठी उच्च वयोमर्यादेत त्यांचा जनगणना कार्यालयातील सलग सेवेचा कालावधी अधिक 5 वर्षे एवढी उच्च वयोमर्यादा खालील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून शिथील करण्यास शासन मान्यता देत आहे :-

(अ) अशा कर्मचा-यांनी जनगणना कार्यालयात कमीत कमी सहा महिने सलग सेवा केलेली असावी.

(ब) त्यांची जनगणना कार्यालयातील नियुक्ती संबंधित पदासाठी विहित वयोमर्यादा व शैक्षणिक पात्रता यास अनुसरुन झालेली असावी.

(क) त्यांची सेवामुक्तता पदे कमी झाल्यामुळे झालेली असावी, आणि

(ड) सेवामुक्त झाल्यानंतर त्यांनी सेवायोजन कार्यालयामध्ये नाव नोंदविलेले असावे.

2. हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे प्राप्त मागणीपत्राच्या अनुषंगाने आयोगाने जाहिरात प्रसिध्द केली असल्यास, अथवा मुलाखती घेतल्या असल्यास, अशा बाबतीत या शासन निर्णयातील आदेश लागू होणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भि. रा. वाडदे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

मगमु-रोटा-साप्रवि-1056(5000-12-98)

(कृ.मा.प.

सर्व मंत्रालयीन विभाग,

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,

सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती.

---

* पत्राद्वारे.

---

एम-1056(5000-12-98)अ.